राज्यात सद्यस्थितीत सुरु असलेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्था/महाविद्यालयांना नॅशनल स्कील क्वालिफिकेशन फ्रेमवर्क (NSQF) रुपांतरीत नवीन व्यवसाय अभ्यासक्रम राबविण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी २०२३/प्र.क्र.१४/कौशल्य-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक : ३० मे, २०२५

वाचा:

१) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०२३/प्र.क्र. १४/कौशल्य-२, दिनांक २० जून, २०२३.
२) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०२३/प्र.क्र.१४/कौशल्य-२, दिनांक २४ नोव्हेंबर, २०२३
३) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०२४/प्र.क्र. २५/कौशल्य-२, दिनांक १४ मार्च, २०२४
४) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०२३/प्र.क्र. १४/कौशल्य-२, दिनांक ६ जून, २०२४.

प्रस्तावना :

सन १९६४ मधील डॉ. कोठारी आयोगाच्या शिफारशीनुसार अधिकाधिक युवकांना विविध व्यवसायांचे प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने, रोजगार/स्वयंरोजगार करण्यास प्रवृत्त करून महाविद्यालयीन शिक्षणाकडे जाणारा लोंढा थांबवावा या उद्देशाने १९७८-७९ पासून राज्यात व्यवसाय विषयांची ३०% व्याप्ती असलेले, +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात आले. सद्यस्थितीत तांत्रिक / वाणिज्य / कृषी / मत्स्य या गटातील एकूण १६ व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविण्यात येतात. संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २०.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये तांत्रिक गट, वाणिज्य गट व कृषी गटातील एकूण १३ व्यवसाय अभ्यासक्रम नॅशनल स्कील क्वालिफिकेशन फ्रेमवर्कशी (National Skill Qualification Framework) सुसंगत करण्यात आलेले आहेत. सदर NSQF रुपांतरित द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम हे शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून राबविण्यास मान्यता देण्यात आलेली होती. तद्नंतर सदर अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२४-२५ मध्ये राबविण्यास संदर्भ क्र. (४) अन्वये स्थगिती देण्यात आली होती. सदर स्थगितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात सद्या सुरू असलेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्था/महाविद्यालयांना NSQF रुपांतरीत नवीन व्यवसाय अभ्यासक्रम राबविण्यास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पर्यंत देण्यात आलेल्या स्थगितीस शैक्षणिक वर्ष २०२५-२६ व २०२६-२७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सद्यस्थितीत सुरु असलेले द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्था/महाविद्यालयांनी संदर्भ क्र. (१) च्या शासन निर्णयामध्ये नमुद केलेले NSQF रुपांतरीत नवीन व्यवसाय अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२७-२८ पासून सुरु करावेत.

३. सद्यस्थितीत सुरु असलेले द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्था/महाविद्यालयांना संदर्भ क्र. (१) च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भ क्र. (२) व (३) येथील शासन निर्णयांतील तरतुदी शैक्षणिक वर्ष २०२७-२८ पासून लागू राहतील.

४. द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या ज्या संस्थांनी/ महाविद्यालयांनी नवीन किंवा अधिकच्या तुकड्यांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी ऑनलाईन प्रणालीद्वारे अर्ज सादर केले आहेत, त्यांना मान्यता देण्याबाबतची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येत आहे. याअनुषंगाने त्यासंबंधीचे मान्यता आदेश निर्गमित झाल्यानंतर सदर संस्थांना संदर्भ क्र. (१) व (२) च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार NSQF रुपांतरीत नवीन व्यवसाय अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून राबविता येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०५३०१६४४४३२८०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT,
2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2025.05.30 17:23:06 +05'30'

**(प्रदीप सा. शिवतरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. सभापती / उपसभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई मा.
१०. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
११. मुख्य सचिव यांचे, मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (शालेय शिक्षण विभाग), (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/पुणे/छत्रपती संभाजीनगर/अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१७. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१८. संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१९. निवड नस्ती (कौशल्य-२).